**उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, गट-अ (राजपत्रित) या पदावर पदोन्नतीने पदस्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक - बदली-२०१८ /प्र.क्र.७५/ग्रासं-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मे, २०१८

**संदर्भ:-** दिनांक २४ मे, २०१८ रोजी चा शासन आदेश

**शासन आदेश :-**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील वैधमापन शास्त्र यंत्रणेत उपनियंत्रक, गट-अ (वेतनश्रेणी) रु. १५६००-३९१०० + रु. ५४०० ग्रे.वे) या संवर्गात रिक्त असलेल्या पदावर संदर्भाधीन शासन निर्णयान्वये खालील सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांना तात्पुरती पदोन्नती देण्यात आली असून संबंधित अधिका-याची नियुक्ती त्याच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिका-यांचे नाव | सध्याच्या पदावर कार्यरत असल्याचे ठिकाण | उप नियंत्रक, बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. ल. बे. हारोडे | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र, अकोला | उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, कोकण विभाग |
| २ | श्री. श. तु. चालिकवार | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र, औरंगाबाद विभागीय कार्यालय | उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, औरंगाबाद विभाग |
| ३ | श्री. शि. स. काकडे | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र, कोकण विभाग | उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुख्यालय |
| ४ | श्रीमती सि. सु. बैस | सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र, पुणे | उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, पुणे विभाग |

२. संबंधीत उप नियंत्रक यांनी बदलीचे ठिकाणी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता हेच कार्यमुक्तीचे आदेश समजुन तात्काळ रुजु व्हावे व संबंधीत प्रभारी उप नियंत्रक यांचेकडून कार्यभार स्वीकारावा तसेच आपला रुजु अहवाल नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना तसेच शासनास त्वरीत सादर करावा.

३. उपरोक्त उप नियंत्रक यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेचा खंड पडण्याची शक्यता देखिल नाकारता येत नाही. याची जाणीव संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

४. संबंधित अधिका-यांना नवीन पदस्थापनेच्या पदावर रुजु होणेसाठी पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता तसेच इतर अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय असतील. तसेच त्यांच्या वेतननिश्चितीबाबतचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्याने त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियंम ११ (एक) (ए) प्रमाणे करण्यात येईल.

५. नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांना कळविण्यात येते की, संबंधीत उप नियंत्रकाने पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहित कालावधीत संबंधीत अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजु न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरीत अवगत करावे. जेणेकरुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरीत करणे शक्य होईल. महाराष्ट्र नागरी सेवा ( रजा ) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिका-यांचे रेजेचे अर्ज स्वीकारु नयेत / मंजुर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०६०४१२१८३६२००६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2018.06.04 12:19:02 +05'30'

**( भा. बा. पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व संबंधीत उपनियंत्रक, वैधमापन शास्त्र

**प्रत :-**

१) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( यांना आवश्यक त्याकार्यवाही करीता)
२) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,
३) मा. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक,
४) उपनियंत्रक, वैधमापन शास्त्र, नागपूर/ पुणे
५) महालेखापाल -१ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल -१ ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला/कोकण/ औरंगाबाद/ पुणे /
९) निवड नस्ती, कार्यासन ग्रासं-३.